१५० दिवसांचा विशेष कार्यक्रम- "विकसित महाराष्ट्र २०४७" संकल्पनेच्या अनुषंगाने Soft Power या गटाच्या अंतर्गत क्रीडा विभागाचे व्हीजन डॉक्युमेंट तयार करण्यासाठी समित्यांची स्थापना करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक - संकिर्ण -३३२५/प्र.क्र. ७३/क्रीयुसे-१**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय विस्तार, मुंबई -४०० ०३२
दिनांक : २० मे, २०२५

**प्रस्तावाना:-**

महाराष्ट्र राज्याच्या सर्वांगीण आणि दीर्घकालीन विकासासाठी १५० दिवसांचा विशेष कार्यक्रम राबविण्यात येत आहे. त्याअंतर्गत विकसित महाराष्ट्र २०४७ संकल्पनेच्या अनुषंगाने मा. मुख्यमंत्री महोदयांनी व्हीजन डॉक्युमेंट करण्याबाबत निदेश दिले आहेत. याअंतर्गत ३ भाग असून त्यामध्ये Long Term Vision, Mid Term Vision व Short Term Vision चा समावेश आहे. या करिता १६ क्षेत्रिय गट निवडले असून त्यामध्ये Soft Power हा एक गट आहे. या गटात ६ विभाग समाविष्ट असून त्यामधील विभागांमध्ये क्रीडा विभागाचा समावेश करण्यात आला आहे.त्यानुसार क्रीडा विभागाचे “व्हिजन- २०४७ डॉक्युमेंट” तयार करण्यासाठी विभागस्तरावर आणि क्रीडा संचालनालय स्तरावर समित्या स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र राज्याच्या सर्वांगीण आणि दीर्घकालीन विकासासाठी "विकसित महाराष्ट्र २०४७" संकल्पनेच्या अनुषंगाने Soft Power या गटाच्या अंतर्गत क्रीडा विभागाचा समावेश आहे. त्या अनुषंगाने क्रीडा विभागाचे व्हीजन डॉक्युमेंट तयार करण्यासाठी खालीलप्रमाणे समित्या गठीत करण्यात येत आहेत.

**१) विभागास्तरावरील समिती :-**

| अ.क्र. | समिती सदस्य | पदनाम |
|---|---|---|
| १ | सचिव/प्रधान सचिव/अपर मुख्य सचिव, क्रीडा विभाग, मंत्रालय मुंबई, | अध्यक्ष |
| २ | उपसचिव, शालेय शिक्षण वक्रीडा विभाग, मंत्रालय मुंबई, | सदस्य सचिव |
| ३ | अवर सचिव/कक्ष अधिकारी (क्रीयुसे-२),<br>शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय मुंबई | सदस्य |
| ४ | अवर सचिव /कक्ष अधिकरी, (क्रीयुसे-३),<br>शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय मुंबई | सदस्य |
| ५ | अवर सचिव /कक्ष अधिकारी (क्रीयुसे-१),<br>शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय मुंबई | सदस्य |

**समितीची कार्यकक्षा :-**

I. क्रीडा क्षेत्राच्या संर्वागिण विकासाकरिता प्राथमिक रूपरेषा सुचविणे.

II. क्रीडा विभागाच्या भविष्यातील विकासाच्या अनुषंगाने विकसित भारत-२०४७ डॉक्युमेंट, आंध्र प्रदेश २०४७, विकसित गुजरात २०४७, महाराष्ट्र एक ट्रिलीयन इकॉनॉमी-२०३०,स्वर्ण आंध्रा,समृध्द मध्यप्रदेश इ. व क्रीडा संचालनालय स्तरावरील समितीने सादर केलेला अहवाल विचारात घेऊन क्रीडा विभागाचे दिर्घावधीचे (Long Term), मध्यावधीचे (Mid Term)व अल्पावधीचे (Short Term) व्हीजन डॉक्युमेंट तयार करणे.

**२) क्रीडा संचालनालय स्तरावरावरील समिती:-**

| अ.क्र. | समिती सदस्यांचे नाव | पदनाम |
|---|---|---|
| १ | आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, संचालनालय, पुणे | अध्यक्ष |
| २ | सहसंचालक, क्रीडा व युवक सेवा, संचालनालय, पुणे | सदस्य |
| ३ | उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा, संचालनालय, पुणे | सदस्य |
| ४ | विभागीय क्रीडा उपसंचालक, नागपूर विभाग, | सदस्य |
| ५ | क्रीडा क्षेत्रातील राज्यस्तरीय / आंतरराष्ट्रीय तज्ञ (एक) | निमंत्रित सदस्य |
| ६ | क्रीडा क्षेत्रातील अनुभवी खेळाडू (एक) | निमंत्रित सदस्य |
| ७ | उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा, संचालनालय, पुणे | सदस्य सचिव |

समितीची कार्यकक्षा :-

१) विविध क्षेत्रातील अनुभवी खेळाडू, क्रीडा संस्था, क्रीडा संघटना, व्यक्ती इत्यादींशी चर्चा विनिमय करून व इतर राज्यांच्या व्हिजन डॉक्युमेंटचा अभ्यास करून राज्याच्या प्रस्तावित व्हीजन डॉक्युमेंटमध्ये कोणकोणत्या बाबींचा समावेश असावा याबाबत क्रीडा विभाग स्तरावरील समितीला वेळावेळी आवश्यक तो अहवाल सादर करण्यात यावा.

२) राज्य शासन व राष्ट्रीय/ आंतरराष्ट्रीय संस्थांशी समन्वय साधून विभागाच्या योजना व उपक्रम सुचवणे

३) महाराष्ट्राच्या क्रीडा क्षेत्राची जागतिक स्तरावर नवीन व प्रभावी ओळख निर्माण करण्यासाठी संकल्पना विकसित करणे. राज्याच्या क्रीडा क्षेत्राचे राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय ब्रँडिंग करण्यासाठी विविध उपक्रम सुचविणे

४) राष्ट्रीय व जागतिक स्तरावरील राज्याच्या क्रीडा योगदानाबाबत प्रचार व प्रसिद्धी करून व त्यायोगे राज्यात गुंतवणूक आकर्षित करण्यासाठी उपाय सुचविणे.

५) राज्याच्या क्रीडाक्षेत्राच्या विकासासाठी विविध आंतरराष्ट्रीय/राष्ट्रीय क्रीडा स्पर्धांचे आयोजन करणे आणि त्यामध्ये राज्यातील खेळाडूंचा सहभाग वाढवण्यासाठी उपाययोजना सुचविणे.

६) शालेय स्तरापासून क्रीडा संस्कृती विकसित करण्यावर भर देण्याबाबत उपाययोजना सूचविणे.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०५२०१११९२५७२२१ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RANSING ANANDRAO DERE

Digitally signed by RANSING ANANDRAO DERE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=9651a3c25d5e1f106e47059f72760ff520f9b00f67c3e9186e40ed4bd4fbaee6, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=41EC78BC14804BABDC24C7FD31BA9FBF63804F499D4335774E27423E40136397, cn=RANSING ANANDRAO DERE
Date: 2025.05.20 11:20:23 +05'30'

**(रणसिंग डेरे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत :**

१. मा.राज्यपालाचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय,मुंबई
३. मा.उपमुख्यमंत्री ( नगर विकास व गृहनिर्माण ) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय,मुंबई
४. मा.उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय,मुंबई
५. मा.मंत्री (क्रीडा व युवक कल्याण), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. अपर मुख्य सचिव, (अ.का.) क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक
७. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे.
८. सर्व विभागीय क्रीडा उपसंचालक,
९. सर्व जिल्हा क्रीडा अधिकारी,
१०. निवड नस्ती (क्रीयुसे-१)..